# आगीचा डोंगर

जोआन सैंडिन

चित्र : थॉमस लुईस





एक शेतकरी होता तो मेक्सिको देशात राहत होता.  एका छोट्या गावात एका खोलीचं त्याचं घर होतं.



पण हा शेतकरी आनंदी नव्हता.

“इथे काही घडतच नाही’”,असं तो सारखं म्हणायचा.

इतर गावकऱ्यांना हा शेतकरी थोडा वेडा वाटायचा.

“आपल्याला ज्याची गरज आहे, ते आहे की सगळं आपल्याकडे!”, असं ते म्हणायचे.

“आपल्या गावात शाळा आहे, बाजार आहे.

एक जुने चर्च आहे. चर्चवर जुनी घंटाही आहे, जी प्रत्येक रविवारी वाजते. आपलं गाव सगळ्यात भारी आहे.”

“पण कधी काही घडतच नाही”,
अशी कुरकुर शेतकरी करायचा.

भल्या पहाटे जेव्हा शेतकरी
उठायचा तेव्हा त्याची नजर
सगळ्यात आधी त्याच्या छोट्या
घराच्या छपराकडे जायची.
दररोज सकाळी तो मक्याच्या
पिठाच्या दोन
भाकऱ्या खायचा. त्याच्या
बायकोने आदल्या रात्री बनवलेल्या
असायच्या.
भाकरीवर मध घालून, मातीच्या
भांड्यात दालचिनीचा
चहा पिऊन त्याचा
नाश्ता व्हायचा.
“पण इथे कधी काही घडतच नाही”
अशी कुरकुर सुरूच असायची.





अजून सगळीकडे अंधारच होता आणि शेतकरी शेतात जायला निघाला.

त्याचा मुलगा  पाब्लो अजून झोपलेला होता.

त्याची बायको  म्हणाली " कदाचित आज काहीतरी घडेल".

"नाही, इथे कधी काही घडतच नाही" असं कुरकुरत, बैलांना घेऊन तो शेतात जायला निघाला.

मागे वळून जराही बघितलं नाही.

रात्री अंधार झाल्यावर शेतकरी परतला. बैलांना चारा घातला. तो चुलीपाशी हात शेकत बसला. पाब्लो पाच गुळगुळीत दगडांशी खेळत होता. त्यानी केलेल्या छोट्या खड्ड्यात ते दगड  टाकायचे, असा त्याचा खेळ होता. “बघा बाबा! एक दगड गेला त्या खड्ड्यात!” असं तो आनंदाने म्हणाला.



शेतकऱ्याने लक्षच दिले नाही. कारण तो खूप दमला होता. त्याचा प्रत्येक दिवस सारखाच जायचा.

एकदा भल्या पहाटे शेतकऱ्याला जाग आली. त्यानी लोकरीचा स्वेटर घातला. खुंटीवर टांगलेली मोठी टोपी चढवली  आणि विचार केला
“ मला लवकर शेतावर गेलं पाहिजे.”
“मका पेरायची वेळ आली पण अजून शेत नांगरून झालेलं नाही.”



सगळी सकाळ बैलाच्या मदतीने शेतकऱ्याने शेताची नांगरणी केली.

तेवढ्यात नांगरताना एक भला मोठा खडक लागला आणि बैल फतकल मारून खाली बसला.
शेतकऱ्याने खडक बाजूला केला .
“चल,चल” असं म्हणत बैलाला हलवलं.
बैलाने शेतकऱ्याकडे एक नजर फिरवली आणि उठून नांगरणीला सुरुवात केली.



दुपारी  जेव्हा ऊन तापलं होतं,
तेव्हा पाब्लो शेतात आला.



”पाब्लो! इथे काय करतोयस, तू शाळेत का नाही  गेलास?” शेतकऱ्याने विचारलं.

 “बाबा, आज सुट्टी आहे”  पाब्लो  उत्तरला.

“मी तुम्हाला नांगरणीसाठी मदत करायला आलोय”. पाब्लो  म्हणाला. शेतकऱ्याला हसू आलं.

 त्याने त्याच्या  खिशातल एक लाकडी  खेळणं पाब्लोला  दिलं.

 “बैल!” पाब्लो ओरडला.

दुपारी उन्ह तापलेली असताना, विश्रांतीच्यावेळी शेतकऱ्याने हे खेळणं आपल्या मुलासाठी तयार केलं होतं.



पाब्लो बाबांना नांगरणीला मदत करू लागला.

बैल जसा पुढे जात होता तसा नांगर शेतातली माती उकरत होता.
पण नांगर एकदम थांबला.
शेतकरी आणि त्याचा मुलगा धक्का देत होते आणि बैल खेचत होता. पण तरीही नांगर जराही हलत नव्हता. तो खाली खाली खोल जमिनीत जाऊन, एका छोट्या खड्ड्यात रुतत होता.



हळूहळू तो छोटा खड्डा मोठा व्हायला लागला.

जमिनीतनं  मोठा आवाज यायला लागला.

खोल जमिनीच्या पोटातून.

जणू कोणीतरी गुरगुरत होते.

शेतकऱ्याने खाली वाकून बघितले.

पाब्लोने  पण खाली वाकून बघितले.

बैलाने पण मागे बघितले.

त्या खड्ड्यातून पांढरा धूर यायला लागला.



“पळा!”,शेतकरी ओरडला.

“पळा!”

तेवढ्यात मोठा आवाज येऊन जमिनीला

मोठी भेग पडली.

शेतकरी पळाला.

पाब्लो पळाला आणि बैलही पळाला.

जमिनीतून धूर आणि आग येऊ लागली.



शेतकरी पळत गावात
आला.
चर्चमध्ये घुसला
आणि चर्चमधली जुनी घंटा
जोरजोरात वाजवू लागला.





इतर शेतकरी त्यांच्या शेतातून धावत आले.
लोक आपापल्या घरातून बाहेर आले.

“बघा!, तिथे बघा”,शेतकरी ओरडला.

त्या रात्री कोणीही झोपले नाही.
सगळेजण आग बघत राहिले.



शेतकऱ्याच्या शेतातूनच ती
आग येत होती.

एक मोठा आवाज आला
“बुम”. मग अजून एक आला.
अजून एक...



जमिनीतून भयंकर गरम लावारस बाहेर पडायला लागला. हा रस आजूबाजूच्या जमिनीवर, झाडांमधून सगळीकडे पसरू लागला.

तो शेतकऱ्याच्या घराकडे येऊ लागला. हळूहळू गावाच्या दिशेने पसरू लागला. आगीने जळणारे दगड इकडे तिकडे उडू लागले.





जणू काही जमिनीला खोकला झाला होता. प्रत्येक वेळी खोकल्यावर, आग ओकल्यावर, आगीचा डोंगर अजून मोठा होत होता.

थोड्यादिवसात आगीचा डोंगर, आगीचा पर्वत बनला.

“बुम, बुम” असे आवाज सारखे येऊ लागले.

खारी आणि ससे सैरभैर धावू लागले आणि पक्षी आगीपासून दूर उडू लागले.

लोकांनी आपली जनावरे आणि बैल सुरक्षित जागी नेऊन ठेवले.

सगळीकडे राख, लाल दगडांचे तुकडे इकडे तिकडे उडत होते.

शेतकरी आणि इतर गावकऱ्यांनी धुरापासून वाचण्यासाठी नाका भोवती ओला कपडा बांधून ठेवला.



काही लोक उकळत्या लावाच्या जवळ गेले. त्यांच्या हातात क्रॉस होता.

त्यांनी आग विझण्याची प्रार्थना केली. शेतकरी आणि पाब्लो हे सगळं डोंगराच्या पलिकडून बघत होते.



आवाज थांबल्यावर, आग थोडी कमी झाली. तोपर्यंत शेतकऱ्याचे घर जळून गेले होते .

शाळा जळून गेली. बाजार जळून गेला.

अर्ध गाव जळून खाक झालं.

मग एके दिवशी गणवेश घातलेले काही लोक गाड्या आणि ट्रक घेऊन त्यांच्या गावात आले.

“तोच का तू ज्याच्या नांगरामुळे जमीन फुटली!” ते शेतकऱ्याला हसत म्हणाले.

“तू जिवंत आहेस हे तुझं नशीब.”





सैनिकांनी गावावर एक नजर टाकली आणि कॅप्टन म्हणाला,“सगळ्यांनी आत्ताच्या आत्ता इथून निघा.”

“आता इथे अजून राहणं सुरक्षित नाही.” शेतकरी, त्याची बायको, पाब्लो आणि इतर सर्व गावकरी सैनिकांबरोबर गेले. त्यांचे सामान ट्रक मधनं हलवले.





आता शेतकऱ्याला नवीन घर मिळाले. ते आधीच्या घरापेक्षा मोठे होते.

हे नवीन घर जुन्या घरापासून फार दूर नव्हते. पण त्या “राक्षसी” ज्वालामुखी पासून पुरेसे लांब होते.
लोकांनी त्या भयानक ज्वालामुखीला “राक्षस”, नाव पाडले.

आता लोकांनी नवीन गाव वसवलं.

नवीन शाळा बांधली, नवीन बाजारही मांडला.



आता ते सुरक्षित असल्यामुळे त्यांनी गावाचा उत्सव केला. या उत्सवात त्यांनी बँड वाजवला, लोक नाचले, त्यांनी टाळ्या वाजवल्या आणि आनंद साजरा केला.





बसमधून शहरातून लोक
या राक्षसी ज्वालामुखीला
बघायला येऊ लागले.
गावकऱ्यांनी त्यांना संत्री कलिंगड.
मक्याचे केक आणि हॉट डॉग विकायला
सुरुवात केली.

आता शेतकऱ्याला नवीन शेत मिळाले होते.
रोज पहाटे उजाडलं नसताना तो झळकणाऱ्या, तापलेल्या राक्षसी ज्वालामुखीकडे बघत बसायचा.

नेहमीप्रमाणे आदल्या रात्री त्याच्या बायकोने बनवलेल्या मक्याच्या दोन भाकऱ्या खाऊन नाश्ता करायचा.

पूर्वीसारखाच शेतकरी त्याच्या शेतावर जाऊ लागला आणि त्याचा बैल ही त्याच्याबरोबर जाऊ लागला.





कधी कधी पाब्लो त्याच्या गावातल्या मित्र-मैत्रिणींना घेऊन शेतावर यायचा.

शेतातून त्यांना जळणाऱ्या ज्वालामुखीचा धूर दिसायचा. जणू एखादा म्हातारा माणूस त्याची चिलीमच ओढत आहे!

मुले शेतकऱ्याला म्हणाली "तुम्ही अजून एक आगीचा डोंगर तयार कराल का?"



"नाही रे बाबा! नको ,नको",
शेतकरी म्हणाला आणि हसला.
"माझ्यासाठी हा एक आगीचा
डोंगर पुरेसा आहे!"

## लेखकाची नोट

ही गोष्ट एका सत्य घटनेवर आधारित आहे. 20 फेब्रुवारी 1943 ला उफाळलेल्या परिकुटि ज्वालामुखीच्या बातमीवर आधारित आहे. हा ज्वालामुखी मैक्सिकन राज्य मिचोआकानमध्ये, डायोनिसियो पुलिडो नावाच्या एका टारस्कैन इंडियन जमातीच्या शेतकऱ्याच्या मक्याच्या शेतात उफाळून आला होता सुदैवाने कोणीही मरण पावले नाही. परंतु 2000 पेक्षा अधिक लोक बेघर झाले.

याआधी फक्त एकदाच मनुष्याने स्वतःच्या डोळ्यांनी ज्वालामुखीचा उद्रेक बघितला आहे. तो कॅनरी बेटांच्या समूहामध्ये, टेनेरीफ इथे घडला.

आजही, लोक पारिकुटीन बघायला जाऊ शकतात. त्यांना ज्वालामुखी दिसू शकतो. टणक झालेल्या राखेत व लावारसात दबलेलं ते ओसाड गावही दिसू शकते.

पाब्लोच्या वडिलांचा दिवस नेहमीसारखाच असायचा. पण एके दिवशी जमीन गुरगुरली, धूर यायला लागला आणि त्यांचा नांगर गिळून टाकला.

त्यांच्या मक्याच्या शेतामध्ये ज्वालामुखी खदखदत होता!